The Department of Public Instruction, Bombay.

# MARAṬHI VṚITTADARPANA,

OR

# MIRROR OF PROSODY.



BY

PARASHURAM BALLAL GODBOLE.

SIXTH EDITION.—5,000 Copies.





Bombay:
GOVERNMENT CENTRAL BOOK DEPOT.

1874.



*Price One Anna Nine Pies.*

मुंबई इलाख्यांतील सरकारी विद्याशाळांसाठीं.

# वृत्तदर्पण.

हें,

परशुरामपंत गोडबोले

त्यांनीं केलें.

आवृत्ति सहावी—५००० प्रती.

पुस्तकाची मालकी सन १८६७ च्या २५ व्या आक्टाप्रमाणें नोंदिली आहे.

---

मुंबई.

गवर्नमेंट सेंट्रल बुक डिपो.

---

इसवी सन १८७४.



किंमत पावणे दोन आणे.

# प्रस्तावना.

कवितेचा ( पद्यरूप कवितेचा ) अभ्यास करणार विद्यार्थ्यांस कवितेच्या प्रकारांचें व भेदांचें ज्ञान अवश्य असलें पाहिजे. तशी माहिती नसली तर प्राचीन कवींच्या व अर्वाचीन कवींच्या कविता पाहण्यास किंवा नवीन कविता करण्यास मोठी अडचण पडते.

कवितेचे प्रकार संस्कृत भाषेंत विद्वानांनीं लिहून ठेविले आहेत. परंतु संस्कृत भाषा शिकल्यावांचून ते समजावयाचे नाहींत.

तेच प्रकार प्राकृत कवींनीं आपल्या कवितेंत घेतले आहेत. तरी संस्कृत ग्रंथांत जितके प्रकार सांगितले आहेत तितके घेतले नाहींत असें त्यांचे ग्रंथ पाहिल्यावरून समजतें.

ह्या विषयावर प्राकृत भाषेंत झालेला ग्रंथ प्रसिद्धीस आला नाहीं. तो अवश्य असावा असें मनांत आणून विद्यार्थ्यांस वृत्तांची साधारण माहिती थोडक्यांत होण्याकरितां संस्कृत ग्रंथाच्या आधारानेंच हा लहानसा पद्यात्मक प्राकृत ग्रंथ केला आहे. त्यांत संस्कृतांतल्या प्रमाणें वृत्तांचे सर्व प्रकार घेतले नाहींत. प्राचीन कवींचे बहुतेक पद्यात्मक ग्रंथ पाहून त्यांत वृत्तांचे व छंदांचे जे जे भिन्न भिन्न प्रकार आढळले त्यांचा मात्र येथें संग्रह केला आहे.

ह्या लहानशा ग्रंथाचा जे कोणी लक्ष्य लावून अभ्यास करतील त्यांस वृत्तांविषयीं बरीच माहितगारी होईल. किंबहुना पद्यरूप नवी कविता शुद्धरीतीनें करण्याची शक्ति येईल.

हा ग्रंथ निर्दोष असेल असें म्हणवत नाहीं. कोठें कोठें दोष राहिले असतील, तथापि नवीन कृतीकडे लक्ष्य देऊन सज्जन क्षमा करतील असा भरंवसा आहे.

आर्या.

कविता असो कशी तरि तात्पर्यावरिच सज्जनीं दृष्टी ॥
द्यावी, तेणें होतो बाळोंकें तेंवि तन्मनस्तुष्टी ॥ १ ॥

प० व० गो०

## उपोद्घात.

### श्लोक.

नमूनि देवदेवातें रसिक[1] स्वांततर्पण ॥
बालबोधार्थ करितों अल्प हें वृत्तदर्पण ॥ १ ॥
छंदें वृत्तें संस्कृतांत वर्णिलीं असती मुळीं ॥
पाहून त्याच रीतीनें देश[2] भाषेंत सांगतों ॥ २ ॥

कविता दोन प्रकारची आहे. एक गद्यरूप आणि एक पद्यरूप. ज्याला पाद नाहींत तें गद्य, आणि ज्याला पाद आहेत तें पद्य. त्या पद्यालाच श्लोक, छंद, वृत्त असें म्हणतात. पद्यरचनेविषयीं संस्कृत भाषेंत पिंगलादिकांनीं नियम सांगितले आहेत, ते प्राकृत जनांस समजण्या करितां त्याच नियमांच्या आधारानें वृत्तांचीं लक्ष्य लक्षणें महाराष्ट्र भाषेंत पद्यरूपानें सांगतों

### गीति.

छंदःशास्त्रीं जितकीं छंदें वृत्तें हि वर्णिलीं असती ॥
तितकीं प्राकृतभाषे मध्यें कोणींहि घेतलीं नसती ॥ ३ ॥
प्राकृत कविनीं जीं जीं वृत्तें पाहोनि घेतलीं गोडीं ॥
तीं तींच वर्णितों मी येतिल बहुतेक राहतिल थोडीं ॥ ४ ॥

संस्कृत भाषेंत वृत्तांचे प्रकार बहुत आहेत, म्हणजे एक अक्षराचा पाद, दोन अक्षरांचा पाद, तीन अक्षरांचा पाद असे चढत चढत सव्वीस अक्षरांचा पाद पर्यंत छंदें सांगितलीं आहेत, परंतु प्राकृत भाषेंत तितके प्रकार प्रसिद्ध नाहींत.

---

१ रसिक जनांच्या हृदयास तृप्त करणारें. २ महाराष्ट्र भाषेंत.

एका अक्षरापासून सात अक्षरांपर्यंत पादांचीं वृत्तें येथें घेतलीं नाहींत, आठ अक्षरांच्या चरणापासून तेवीस अक्षरांच्या चरणापर्यंत मात्र वृत्तें घेतलीं आहेत.

गीति.

जी नियत अक्षरांची रचना तिस म्हणति वृत्त कीं छंद ॥
अक्षरगणभेदांनीं होती त्यांचे अनेकविध भेद ॥ ५ ॥

चरणाचीं अक्षरें सारखीं असून गणभेदांनीं अवांतर भेद पुष्कळ होतात. त्यांतून प्रसिद्ध वृत्तें घेतलीं आहेत.

परिभाषा.

गण दोन प्रकारचे आहेत. अक्षरगण आणि मात्रागण. अक्षरगण आठ आहेत, आणि मात्रागण पांच आहेत.

अक्षरगण.

दिंडी.

गणामध्यें अक्षरें तीन येतां ॥ ह्रस्वदीर्घांनीं आठ भेद होती ॥
य र त न भ ज स म हि अशीं आठ नांवें ॥ फोड त्यांची सांगतों आयकावें ॥ ७॥

अक्षरगणलक्षण.

अभंग.

आद्यलघु जो तो यगण म्हणावा ॥
रगण गणावा मध्यलघु ॥ ८ ॥
अंत्यलघु जो तो तगण म्हणावा ॥
नगण गणावा सर्वलघु ॥ ९ ॥
आद्यगुरू जो तो भगण म्हणावा ॥
जगण गणावा मध्यगुरू ॥ १० ॥
अंत्यगुरू जो तो सगण म्हणावा ॥
मगण गणावा सर्वगुरू ॥ ११ ॥

### उदाहरण. श्लोक. अनुष्टुप्.

य, यमाचा, न, नमन, त, ताराप, र, राधिका ॥
म, मानाता, स, समरा, ज, जनास, भ, भास्कर ॥

ह्या श्लोकांत छंदोनुरोधानें गणांचा क्रम साधला नाहीं म्हणून खालीं क्रमानें गण लिहितों.

यमाचा, हा यगण, आद्यलघु ॥
राधिका, हा रगण, मध्यलघु ॥
ताराप, हा तगण, अंत्यलघु ॥
नमन, हा नगण, सर्वलघु ॥
भास्कर, हा भगण, आद्यगुरु ॥
जनास, हा जगण, मध्यगुरु ॥
समरा, हा सगण, अंत्यगुरु ॥
मानाता, हा मगण, सर्वगुरु ॥

### लघु गुरु संज्ञा.

श्लोक.

ऱ्हस्व स्वरातें लघु बोलताती ॥
दीर्घ स्वरातें गुरु नाम देती ॥
पुढें[१] अनुस्वार विसर्ग येतां ॥
संयोग ऱ्हस्वास गुरुत्व देतां ॥ १२ ॥

हा नियम प्राय: संस्कृत शब्दांत लागू आहे. जसें कंक, दुःख, पर्व, पत्र, इत्यादि. ह्यांतील पहिलीं ऱ्हस्व अक्षरें गुरु समजावीं, परंतु प्राकृत शब्दांत तसें नाहीं. जंव, तंव, तुम्ही, तुझ्या, तिच्या, दुसऱ्या, इत्यादि. ह्यांतील पहिल्या ऱ्हस्वाक्षराला गुरुत्व मानीत नाहींत. दोन समान व्यंजनें पुढें असलीं तर मात्र ऱ्हस्वास गुरुत्व येतें. जसें कित्ता, पट्टा, गप्पा, हुद्दा, इत्यादि.

---

१ ऱ्हस्व स्वरापुढें जेव्हां अनुस्वार, विसर्ग, किंवा संयोग येतो तेव्हां त्या ऱ्हस्व स्वरास गुरुत्व येतो असा अर्थ, क्वचित् प्राकृतीं ऱ्हस्वास गुरुत्व येतें.

## मात्रालक्षण.

मात्रा म्हणजे अक्षराच्या उच्चारणकाळाचें प्रमाण.

### श्लोक. अनुष्टुप्.

लघूची तों एक मात्रा गुरूच्या दोन मानिती ॥
मात्रावृत्तीं याच रीती मात्रांनीं गण मोजिती ॥ १३ ॥

लघु अक्षराचें चिन्ह ᵕ असें आहे आणि गुरु अक्षराचें चिन्ह -असें आहे.

## मात्रागण.

### आर्या.

गण एक एक होतो मात्रांचा चार चार मात्रांनीं ॥
लघुगुरुभेदांनीं ते मात्रांचे पांच गण होती ॥ १४ ॥

## मात्रागणलक्षण.

### आर्या.

द्विगुरु मगण, लल ग सगण, ल ग ल जगण, गलल भगण, मनिं आणा ॥
चारहि लघु तोचि नगण, ऐसे हे पांच गण जाणा ॥ १५ ॥

### उदाहरणें.

मेधा हा मगण. ह्यांत दोन गुरु आहेत.

सविता हा सगण. ह्यांत दोन लघु एक गुरु.

जनास हा जगण. ह्यांत लघु, गुरु, लघु.

भाजन हा भगण. ह्यांत गुरु, लघु, लघु.

नवरस हा नगण. ह्यांत चारही लघु आहेत.

चार मात्रांचा गण भरावयास ह्या पांचां वांचून कोणताही गण येऊं शकत नाहीं.

## वृत्ताचे आणखी तीन भेद.

समवृत्त, अर्धसमवृत्त, आणि विषमवृत्त. वृत्ताला प्रायः चार भाग असतात. प्रत्येक भागाला चरण किंवा पाद म्हणतात. ज्या वृत्ताचे चारी चरण सारखे तें समवृत्त, ज्याचे प्रथम तृतीय चरण आणि द्वितीय चतुर्थ चरण सारखे तें अर्धसमवृत्त, आणि ज्याचे चारी चरण भिन्न लक्षणांचे तें विषमवृत्त. प्राकृत भाषेत विषमवृत्त कोठें आढळत नाहीं. अर्धसमवृत्तें तरी क्वचित. समवृत्तें मात्र फार आहेत.

### श्लोक अनुष्टुप.

वृत्ताचा जो चतुर्थांश तयाला पाद बोलिजे ॥
पादाच्या[1] लक्षणें सर्ववृत्तलक्षण जाणिजे ॥ १६ ॥

वृत्तें पुष्कळ आहेत, त्यांत कोणतें वृत्त कोणत्या रसाला अनुकूळ, व कोणतें वृत्त कोणत्या रसाला प्रतिकूळ ह्याविषयींही नियम आहेत, परंतु त्यांचा विचार येथें केला नाहीं.

### ह्या ग्रंथांतील विशेष संकेत.

### श्लोक. अनुष्टुप.

पादार्थीं पद[2] ही कोठें गणार्थीं संघ घेतला ॥
अक्षरार्थीं अवयव लला लघु गगा गुरु ॥ १७ ॥
अक्षरें[3] गणसंज्ञेचीं जरी आहेत ऱ्हस्व तीं ॥
छंदाच्या अनुरोधानें कोठें दीर्घहि घातलीं ॥ १८ ॥

---

१ एका पादाच्या लक्षणा वरून सर्व वृत्ताचें लक्षण समजावें. हें समवृत्ताविषयीं मात्र समजावें. कारण कीं त्याचे चारी चरण सारखे असतात.

२ पद म्हणजे पाद, संघ म्ह० गण, अवयव म्ह० अक्षरें, ल किंवा ला म्ह० लघु, आणि ग किंवा गा म्ह० गुरु असें समजावें.

३ य र त भ ज स हीं गणसंज्ञेचीं अक्षरें कोठें कोठें या, रा, ता, भा, जा, सा, अशींही योजलीं आहेत.

### गीति.

ज्या वृत्ताचें लक्षण तें त्या वृत्तींच कथिन मी स्पष्ट ॥
वास्तव होइल कोठें क्लिष्ट परी साहतील तें शिष्ट ॥ १९ ॥

### श्लोक. अनुष्टुप्.

वृत्तसंज्ञा[1] आद्य पादीं द्वितीयांत गणक्रम ॥
अक्षरें तिसऱ्या पादीं उदाहरण शेवटीं ॥ २० ॥

येथें लक्षणश्लोकाचा चतुर्थ चरण जरी उदाहरणार्थ केला आहे तरी पूर्णपणें समजण्यासाठीं प्रत्येक वृत्तास अन्य ग्रंथांतील एकेक उदाहरण निराळें दाखविलें आहे. क्वचित् अन्यकर्त्यांचें उदाहरण न मिळालें तेथें स्वकृत उदाहरण दाखविलें आहे.

वृत्तामध्यें यति किंवा अवसान कोणत्या अक्षरावर असावें हें समजण्याकरितां त्या त्या वृत्ताच्या नांवापुढें अंक घातले आहेत आणि ज्याला पादांतीं यति आहे त्यापुढें पा० असें अक्षर घातलें आहे.

या ग्रंथांत पुढें जीं वृत्तें सांगावयाचीं आहेत त्यांचीं नांवें अनुक्रमानें सांगतों.

| वृत्तांचीं नांवें. | पादाक्षरें. | वृत्तांचीं नांवें. | पादाक्षरें. |
|---|---|---|---|
| १ विद्युन्माला........ | ८ | १० कामदा .......... | १० |
| २ माणवक ........ | ८ | ११ शुद्धकामदा ...... | ११ |
| ३ प्रमाणिका........ | ८ | १२ ललित........... | ११ |
| ४ समानिका........ | ८ | १३ इंद्रवज्रा ......... | ११ |
| ५ अनुष्टुप् ........ | ८ | १४ उपेंद्रवज्रा........ | ११ |
| ६ मणिबंध ........ | ९ | १५ उपजाति ........ | ११ |
| ७ चंपकमाला ...... | १० | १६ शालिनी ........ | ११ |
| ८ हंसी .......... | १० | १७ दोधक........... | ११ |
| ९ मत्ता .......... | १० | १८ रथोद्धता ........ | ११ |

[1] हा नियम नरी समवृत्ताविषयीं मात्र लागेल.

## समवृत्तें.

### १ विद्युन्माला. यति. ४.४.

विद्युन्माला ऐसें बोला ॥ जेथें मा मा गा गा आला ॥
आठांनीं या पादें व्हावें ॥ श्रीरामातें भावें ध्यावें ॥

चरणांत अक्षरें ८ गण. म. म. ग. ग.

### उदाहरण. बाहेरचें नवनीत.

दीन प्रेमा ये तूं रामा ॥ सौख्यारामा हृद्विश्रामा ॥
अंतःसद्मा नष्टच्छद्मा ॥ संपद्दामा दे मत्कामा ॥

### २ माणवक. य० पा०

माणवक स्पष्ट म्हणा ॥ भा त ल गा हेच गणा ॥
अक्षरकें अष्टमितें ॥ बालकें तें दुग्ध पितें ॥

चरणांत अक्षरें ८ गण. भ. त. ल. ग.

### उदाहरण. बा० नवनीत.

नित्य नव्हे त्या करितां ॥ कां झटतां कां भ्रमतां ॥
जा भगवन्नाम वदा ॥ निर्भय गा त्यास सदा ॥

### ३ प्रमाणिका.[१] पा०

प्रमाणिका तिला म्हणा ॥ ज रा ल गा असे गणा ॥
पदास आठ अक्षरें ॥ वंदाल सत्य तें बरें ॥

चरणांत अक्षरें ८. गण. ज. र. ल. ग.

### उदाहरण. बा० नवनीत.

अशाश्वतासि वंदितां ॥ व शाश्वतासि निंदितां ॥
असे स्वतांच वागतां ॥ म्हणूनि ताप भोगितां ॥

---

१ तिला नगस्वरूपिणी असेंही नांव आहे.

### समानिका. पा०

ती समानिका घडेल ॥ रा ज गा ल ज्या अडेल ॥
पादिं आठ अक्षरेंच ॥ सांगतों तुम्हां खरेंच ॥

चरणांत अक्षरें ८ गण. र. ज. ग. ल.

### उदाहरण. दुसरें स्वकृत.

तुमचा मि दास सत्य ॥ जें कराल पारपत्य ॥
मान्य तें मुखास व्हाल ॥ योग्य तें तुम्ही कराल ॥

### ५ अनुष्टुप्. पा०

अनुष्टुप् छंद तें ज्याला ॥ एक नेम नसे गणीं ॥
अक्षरें चरणीं आठ ॥ देवा तार मला खरें ॥

चरणांत अक्षरें ८ गणाचा नियम नाहीं.[1]

### उदाहरण. श्रा० मोरोपंत.

सेवा करावया लावा देवा हा योग्य चाकर ॥ ०
या तपाच्या शिरीं आत—पत्र हो तुमचा कर ॥

### ६ मणिबंध.[2] पा०

त्या मणिबंधातें धरिती ॥ भा म स यत्पादा वरिती ॥
अक्षरसंख्या यास नऊ ॥ सन्मनें लोण्याहून मऊ ॥

चरणांत अक्षरें ९ गण. भ. म. स.

### उदाहरण. श्रा० नव०

द्रव्य मिळावें याकरितां ॥ कां हलक्यांना मागवतां ॥
काय नव्हे हो तो धनवान् ॥ ईश रमेचा जो भगवान् ॥

---

१ अनुष्टुप् छंदास जरी गणाचा नियम नाहीं तरी प्रतिचरणाचें पांचवें अक्षर लघु असावें, आणि समचरणाचें सातवें अक्षर लघु व विषमचरणाचें सातवें अक्षर गुरु असावें हलका नियम आहे.

२ या वृत्ताला मणिमध्य असेंही नांव आहे.

७ चंपकमाला. य० ५, ५.

चंपकमाला तीस ह्मणावें ॥ भा म स गा तें जेय गणावें ॥
पांचदुणी[1] पादाक्षर संख्या ॥ शीघ्रं धरावें सज्जनें सख्या ॥

चरणांत अक्षरें १० गण. भ. म. स. ग.

उदाहरण. बा० नव०

धांव मुकुंदा दुष्ट विमर्दा ॥ धांव रमेशा दुःख विनाशा ॥
फार विपत्ती फारच भीती ॥ यांस हरावें सत्वर यावें ॥

८ हंसी. य० ४, ६.

हंसी ऐसें ह्मणतिल तिथें ॥ येती पादीं म भ न ग जिथें ॥
एक्या पादीं अवयव[2] दहा ॥ मुक्तीमध्यें चिर सुख पहा ॥

चरणांत अक्षरें १० गण. म. भ. न. ग.

उदाहरण. बा० नव०

या संसारीं चलच सगळें ॥ आप्त स्नेही तनु धन बळें ॥
विश्वस्रष्ट्या विरहित खरें ॥ विश्वासाचें स्थळ न दुसरें ॥

९ मत्ता. य० ४, ६.

मत्ता ऐसें ह्मणतिल तीतें ॥ येती पादीं म भ स ग जीतें ॥
एक्या पादीं अवयव दाहा ॥ विद्याभ्यासीं अविरत राहा ॥

चरणांत अक्षरें १० गण. म. भ. स. ग.

उदाहरण. दु० स्वकृत.

होते जेव्हां कुसमयिं वृष्टी ॥ पावे तेव्हां सुख बहु सृष्टी ॥
चिंता आहे बहुतचि देवा ॥ त्याची आम्ही करुं बहु सेवा ॥

---

१. पांचदुणी दहा अक्षरें. २ अक्षरें.

### १० कामदा. प्र० ५, ५.

बोलती कवी तीस कामदा ॥ रा य जा ग हे येति ज्या पदा ॥
अक्षरें तिथें योजितां दहा ॥ भो दयानिधे वारिं तापं हा ॥

चरणांत अक्षरें १० गण. र. य. ज. ग.

#### उदाहरण. बा० गोसावीनंदन.

घोर हा नको फार कष्टलों ॥ त्या हितास मी व्यर्थ गुंतलों ॥
वारिं शीघ्र संसारयातना ॥ हे दयानिधे श्रीगजानना ॥

### ११ शुद्धकामदा. प्र० ६, ५.

म्हणति तीस या शुद्ध कामदा ॥ न र र ला ग हे येति ज्या पदा ॥
चरणिं येति एकादशाक्षरें ॥ नृपति मस्तकीं छत्र चामरें ॥

चरणांत अक्षरें ११ गण. न. र. र. ल. ग.

#### उदाहरण. बा० वामन.

प्रगटलासि तूं नंदगोकुळीं ॥ म्हणुनि इंदिरावास या स्थळीं ॥
सकळही सुखी या व्रजीं हरी ॥ विरहदुःखिता गोपसुंदरी ॥

### १२ ललित. प्र० ५, ६.

त्यासही कवी ललित बोलती ॥ रा ज सा ल गा चरणिं दीसती ॥
पांच आणि सा असति अक्षरें ॥ साधु बोलती वचन तें खरें ॥

चरणांत अक्षरें ११ गण. र. ज. स. ल. ग.

#### उदाहरण. दुसु० स्वकृत.

संपदा असे बहुत ज्या घरीं ॥ खावया तिथें मिळति सोयरीं ॥
द्रव्य संपतां पळति तेथुनी ॥ कोणि पाहिना जवळ येउनी ॥

### १३ इंद्रवज्रा. पा०

ती इंद्रवज्रा ह्मणिजे कवीनें ॥ येती त ता जा ग ग हे क्रमानें ॥
या अक्षरें येतिल पादिं अक्रा ॥ मारी अरी जो धरि शंख चक्रा ।

चरणांत अक्षरें ११ गण. त. त. ज. ग. ग.

#### उदाहरण. दु० वेणीसंहार ना०

का टाकिलें शस्त्र रणांत तेणें[१] ॥ साक्षी पृथासूनुच एक जाणें ।
हें कर्म झालें समरांत जेव्हां ॥ होतासि कोठें रणभीरु तेव्हां ॥

### १४ उपेंद्रवज्रा. पा०

उपेंद्रवज्रा ह्मणतात तीला ॥ ज ता ज गा गा गण येति जीला ॥
पदास होणें शिव[२] अक्षरांनीं ॥ पहा मनीं धुंडिशि कायं रानीं ।

चरणांत अक्षरें ११ गण. ज. त. ज. ग. ग.

#### उदाहरण. वा० रघुनाथ पं०

तया वनीं एक तटाक तोयें ॥ तुडुंबलें तामरसानपायें ॥
निरंतरा मंद मरंद वाहे ॥ तपांतही यास्तव रिक्त नोहे ॥

### १५ उपजाति. पा०

एक्या[३] पदीं येइल इंद्रवज्रा ॥ दुज्या पदीं तीच उपेंद्रवज्रा ॥
तेव्हां ह्मणावें उपजाति तीला ॥ पतीस दैवत्व असे सतीला ॥

चरणांत अक्षरें ११ गण.

विषमपादीं त. त. ज. ग. ग. आणि समपादीं ज. त. ज. ग. ग.

#### उदाहरण. वा० नवनीत.

हा बाण गेला वरती मण्याला ॥ धरून पृथ्वीवर आणण्याला ॥
त्याणेंच आला परतून पक्षी ॥ पहा कसा निश्चल रत्न भक्षी ॥

---

१ अश्वत्थामा कर्णास ह्मणतो, द्रोणाचार्यांनीं शस्त्र ज्या टाकलें हें धर्मराज आ
२ भ्रमरा. ३ प्रत्येक श्लोकाच्या पहिल्या पादीं इंद्रवज्रालक्षण आणि दुसऱ्या पादीं उपेंद्रवज्रालक्षण असलें त्या वृत्ताला उपजाति ह्मणावें.

### १६ शालिनी. वृ० ४, ७.

त्या वृत्ताला शालिनी हेंच नाम[1] ॥ जें मा ता ता गा ग पाचें स्वधाम ॥
एक्या पादीं अक्षरें चार सात ॥ तच्छांखांचा बांधें आणा मनांत ॥

चरणांत अक्षरें ११ गण. म. तं. त. ग. ग.

#### उदाहरण. वा० नवनीत.

मीं आत्मा हृत इंद्रियें देह वाणी ॥ बुद्धी वांछा कल्पना वृत्ति यांणीं ॥
जीं जीं केलीं ज्ञान अज्ञात पापें ॥ तीं नाशावीं श्रीहरि स्वप्रतापें ॥

### १७ दोधक. पा०

दोधक नांव तयासचि देती ॥ तीन भ दोन ग हे गण येती ॥
अक्षर मान शिवा[2] सुम जाणा ॥ सत्वर भेटवि तो यदुराणा ॥

चरणांत अक्षरें ११ गण. भ. भ. भ. ग. ग.

#### उदाहरण. वा० नवनीत.

सज्जन पालन पोषण कर्ता ॥ सत्वर सर्वहि संकट हर्ता ॥
तोच खलांस भयंकर शास्ता ॥ वृत्त्यनुरूप हरी फलदाता ॥

### १८ रथोद्धता. वृ० पा०

वृत्त तेंच म्हणती रथोद्धता ॥ रा न रा ल ग असेच तत्वता ॥
रुद्रसंमित[3] पदांत अक्षरें ॥ शास्त्रतत्व समजा मनीं बरें ॥

चरणांत अक्षरें ११ गण. र. न. र. ल. ग.

#### उदाहरण. वा० वामन पं०

मोकळा करुनि कंठ तेधवां ॥ आठवूनि मनिं जानकीधवा ॥
ते[4] रडे भरतही तसा रडे ॥ ओवरी नयन होति कोरडे ॥

---

१ पादांतीं यत्नास मुकून येतें. २ अकरा. ३ अकरा. ४ कौसल्या रडे.

१९ स्वागता. य० पा०

स्वागता म्हणति सुज्ञ तयाला ॥ रा न भा ग ग असे गण ज्याला ॥
अक्षरें वि अकरा पदिं येती ॥ धन्य ते हरिपदीं मनें देती ॥
चरणांत अक्षरें ११ गण. र. न. भ. ग. ग.

उदाहरण. वा० वामन पं०

देखिलें नयनिं नंदकुमारा ॥ श्याम सुंदरवरा सुकुमारा ॥
मंद हास्य अतिरम्य मुखाचें ॥ दाखवी स्वमुख नित्य सुखाचें ॥

२० मौक्तिकमाला. य० ५, ६.

मौक्तिक माला म्हणति तयाला ॥ येतिल भा ता न ग ग जयाला ॥
अक्षर संख्या शिव[1] सम पादीं ॥ लुब्धचि होती भृंग मधुनादीं ॥
चरणांत अक्षरें ११ गण. भ. त. न. ग. ग.

उदाहरण. वा० स्वकृत.

बोलति सारे पशुचि तयाला ॥ अक्षर नाहीं किमपि जयाला ॥
साक्षरता उत्तम पद देते ॥ व्यक्षरता सद्यश धन नेते ॥

२१ भ्रमरविलसित. ४,७.

त्याचीं नावें भ्रमर विलसितें ॥ ज्यांच्या पादीं म. भ. न. ल. ग. मितें ॥
एके पादीं अवयव[2] अकरा ॥ शौर्यो धर्मो उँचिरें नँच करा ॥
चरणांत अक्षरें ११ गण. म. भ. न. ल. ग.

उदाहरण. दु० स्वकृत.

मुद्रा शोभे सुकनक घटिता ॥ कंठीं माला मणिगणखचिता ॥
माथां शोभे सुमन असित तें ॥ अंगा लावी मृगमद नुसतें ॥

---

१ अकरा. २ अक्षरें.

### २२ भद्रिका. पा०

म्हणति बुध तिलाच भद्रिका ॥ न न र ल ग हि जीस मुद्रिका ॥
हरमितें पदिं अक्षरें गणा ॥ संततं हरिहरी मुखें म्हणा ॥
चरणांत अक्षरें ११ गण. न. न. र. ल. ग.

#### उदाहरण. रामचंद्र जोशी.

यदुपतिपदिं या मनास रे ॥ धरिं तरि भववासना सरे ॥
मिळतिल तुज फार मुद्रिका ॥ वसल घरिं सदैव भद्रिका ॥

### २३ भुजंगप्रयात प० ६,६.

भुजंगप्रयातं म्हणावें तयाला ॥ क्रमानेंच येती य चारी जयाला ॥
पदीं ज्याचिया अक्षरें येति बारा ॥ रमा नायका दुःख माझें निवारा ॥
चरणांत अक्षरें १२ गण. य. य. य. य.

#### उदाहरण श्री० रामदास.

मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें ॥ तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥
जनीं निंद्य तें कर्म सोडोनि द्यावें ॥ जगीं वंद्य तें सर्वभावें करावें ॥

### २४ द्रुतविलंबित. पा०

द्रुतविलंबित वृत्त घडे तिथे ॥ न भ भ र क्रम हाचं गणीं जिथे ॥
रविमितें चरणांतिल अक्षरें ॥ चरितिं धर्म करा अपुल्या करें ॥
चरणांत अक्षरें १२ गण. न. भ. भ. र.

#### उदाहरण. वा० वामन पं०

क्षण भरी जरि देह न सूटता ॥ तटतटां त्यजिंचे त्यजिं तूटता ॥
बळ असें कळलें खळसत्तमा ॥ दुरुनि लक्षितसे पुरुषोत्तमा ॥

---

१ मनरचना. २ भक्तरा अक्षरें. ३ कल्याण असेल. ४ बारा अक्षरें. ५ जाणिव-
त्यांचा देह.

### २५ प्रियंवदा. प० ४, ४, ४.

कवि भले ह्मणति ती प्रियवंदा ॥ न भ ज रा गण असे जिच्या पदा ॥
चरणिंचीं असति अक्षरें रवी ॥ नं करि तो अनय जो असे कवी ॥
चरणांत अक्षरें १२ गण न. भ. ज. र.

### उदाहरण. दु० स्वकृत.

मुनिजनीं मदनसा दिसे सये ॥ मज गमे वर तुझ्या मनास ये ॥
जनकजेस रिझवुनियां तदा ॥ वदतसे निजसखी प्रियंवदा ॥

### २६ वंशस्थ. पा०

तयास वंशस्थचि नाम ठेविती ॥ जयास जा ता ज र संघ[१] सेविती ॥
पदांत मार्गा[२] इतकींच अक्षरें ॥ पहा विचारूनि असत्य कीं खरें ॥
चरणांत अक्षरें १२ गण. ज. त. ज. र.

### उदाहरण शा० रघुनाथ पं०

लते तळीं रुंद निरुंद कालवे ॥ गळोनि तेथें मकरंद कालवे ॥
परागही सांद्र तयांत रंगती ॥ फुलांसवें भृंगतती तरंगती ॥

### २७ इंद्रवंशा. पा०

ती इंद्रवंशा कविराज हेरिती ॥ ता ता ज रा हे गण येति येरिती ॥
पादा मधें भानु[३] मितेच अक्षरें ॥ नाहीं प्रपंचातिलं सौख्य तें खरें ॥
चरणांत अक्षरें १२ गण. त. त. ज. र.

### उदाहरण. शा० रामचंद्र जो०

गोपी हरीच्या भजनांत रंगल्या ॥ तें पाहुनी देवि मनांत भंगल्या ॥
हें सौख्य आह्मां न जनांत पातल्या ॥ कीं इंद्रवंशांतहि जन्म घेतल्या ॥

---

१ बारा. २ गण. ३ बारा अक्षरें. ४ बारा अक्षरें.

## २८ तोटक. षा०

वदती कवि तोटक वृत्त तया ॥ चरणीं सचतुष्टय[1] येत जया ॥
दश आणिक दोन पदाक्षर तीं ॥ दुंहं हीं[2] असतीं तरि को क्षरतीं ॥
चरणांत अक्षरें १२ गण. स. स. स. स.

### उदाहरण. वा० नवनोत.

जरि विस्तृत नेत्र अशी असली ॥ हरिणी तुजला दिसली असली ॥
तर मानव रूपवती हरिणी ॥ चल सत्वर दाखिव ती रमणी ॥

## २९ जलोद्धतगति. ६, ६.

जलोद्धतगती तिलाच म्हणती ॥ जिथें गण ज सा ज साच घडती ॥
पदीं असति अक्षरें रविमिती[3] ॥ अनंत गुरु ते मुखें वदु किती ॥
चरणांत अक्षरें १२ गण. ज. स. ज. स.

### उदाहरण. वा० रामचंद्र.जो०

जनाचि सखि लाज ही विसरली ॥ पतिव्रतपणांतुनी घसरली ॥
नसे नवल ऐकतांचि मुरली ॥ मती तिजमधें समग्र मुरली ॥

## ३० स्त्रग्विणी. षा०

स्त्रग्विणी वृत्त हें नांव देती तया ॥ पादिं येति र हे संघ[4] चारी जया ॥
होति बारा पदीं अक्षरें मोजितां ॥ सौख्य होतें मनां ईश्वरीं योजितां ॥
चरणांत अक्षरें १२ गण. र. र. र. र.

### उदाहरण वा० राम० जो०

राधिका रात्रि दारीं उभी राहिली ॥ श्रीधरानें शरत्कालिं ती पाहिली ॥
पूर्णचंद्रानना ध्वांत विद्राविणी ॥ पूर्णमासीच मुक्ताफल स्त्रग्विणी ॥

---

१ चार सगण. २ हीं इंद्रियें. ३ बारा. ४ चार रगण.

### ३१ प्रमिताक्षरा. पा०

प्रमिताक्षरा म्हणति तीस कवी ॥ पदिं सा ज सा स गण हे वदवी ॥
पदिं अक्षरें रविमितें[1] असती ॥ पतिवीनुंनी सुखं गणी नं संती ॥
चरणांत अक्षरें १२. गण स. ज. स. स.

### उदाहरण. दु० स्वकृत.

सकला अनाम सुखदा सरसा ॥ रविभा जशी उदयिं तामरसा ॥
गुरुवाक्करीलघि भवाब्धि रिता ॥ हरिपादजा जशि सिता सरिता ॥

### ३२ वैश्वदेवी. य० ५,७.

त्या त्या वृत्ताला बोलती वैश्वदेवी ॥ ज्या ज्या पादीं हे दोनदां माय[2] ठेवी ॥
एकैका पादीं अक्षरें येति बारा ॥ मिथ्या मानावा हा प्रपंची पसारा ॥
चरणांत अक्षरें १२ गण. म. म. य. य,

### उदाहरण. वा० नवनीत.

या जन्मामध्यें इंद्रियें देह वाणी ॥ आत्मा इद्राच्छा कल्पना वृत्ति यांणीं ॥
जीं जीं मीं केलीं ज्ञात अज्ञात पापें ॥ तीं तीं नाशावीं श्रीहरि स्वप्रतापें ॥

### ३३ मालती. य. ५. ७.

कविजन बोलति तीस मालती ॥ न ज ज र हे गण जीस लागती ॥
भरतिल पादिं शरर्षि[3] अक्षरें ॥ त्वरित करा अपुलें तुम्ही बरें ॥
चरणांत अक्षरें १२ गण. न. ज. ज. र.

### उदाहरण वा० राम० श्लो०

निशि सुमना तिजला घरी पहा ॥ नयनसुखावह रत्न हें महा ॥
नगमणि वालुनियां दिसे कशी ॥ कनकलता नवमालती जशी ॥

---

१ बारा. २ दोन मगण व दोन यगण. ३ शर ५ ऋषि ७ एकून १२.

३४ यूथिका, च० ३, ९.

यूथिका म्हणति वृत्त कवी तया ॥
रा न भा र गण येतिल हे जया ॥
अक्षरें चरणि तीन नऊ पहा ॥
लाभ होइल तुला खरा महा ॥

चरणांत अक्षरें १२ गण. र. न. भ. र.

उदाहरण. बा० अनंतकवि.

दीर्घ रोदन वनीं लहु भायके ॥
कोण गांजित असे मम अंबिके ॥
बाण तीक्ष्ण नशितीं धनुगीं करी ॥
येउनी नमुनि बोलत सुंदरी ॥

३५ प्रभावती. ४,९.

प्रभावती म्हणति सुवृत्तते गुरु[1] ॥
जया पदीं ज भ स ज शेवटीं गुरू ॥
पदामध्यें निदशाधि येति अक्षरें ॥
दयानिधी करिलेचि आमुचे बरें ॥

चरणांत अक्षरें १३ गण. ज. भ. स. ज.

उदाहरण. बा० नवनीत.

चराचरा प्रति उदयास आणितो ॥
जगत्पती अखिल हि हाई आणतो ॥
दयानिधी सकळ विपत्ति वारितो ॥
समर्थ तो शरण अनास तारितो ॥

---

१ श्रेष्ठ.

४

### ३६ मंजुभाषिणी. य० ५, ८.

म्हणती कवी तिसचि मंजुभाषिणी ॥
चरणीं जिच्या स ज स जा ग दाटणी ॥
भरती पदीं त्रिदश संख्य अक्षरें ॥
ठॅसवा मनीं सदुपदेश आदरें ॥

चरणांत अक्षरें १३ गण. स. ज. स. ज. ग.

उदाहरण. श्रा० राम० जो०

हरिवांचुनी घडिभरी घरीं नसे ॥
भुलली तया सतत काय मानसें ॥
परपूरुषीं रति धरी स्वतोषिणी ॥
म्हणतां कशी गरित मंजुभाषिणी ॥

### ३७ प्रहर्षिणी. य० ३, १०.

वृत्तातें म्हणति कवि प्रहर्षिणी त्या ॥
आरंभीं म न ज र शेवटीं ग ये ज्या ॥
एकेका चरणिं सदक्षरें हि तेरा ॥
देवाचें चरितें कसें विचित्र हेरा ॥

चरणांत अक्षरें १३ गण. म. न. ज. र. ग.

उदाहरण. श्रा० नवनीत.

अंगानें सरल तसाच तो मनानें ॥
कालानें चल न तसाच तो धनानें ॥
विद्येनें सरस तसाच तो मतीनें ॥
उक्तीनें चतुर तसाच तो कृतीनें ॥

### ३८ मत्तमयूरी[1]. य० ४, ९.

त्या वृत्ताला बोलति ते मत्तमयूरी ॥
जेथें येती मा त य सा गा गणपूरी ॥
पादीं पादीं अक्षर संख्या समतेरा ॥
श्रीरामाच्या पादसरोजीं सुख हेरा ॥

चरणांत अक्षरें १३ गण. म. त. य. स. ग.

उदाहरण. वा० राम० जो०

माता भ्राता तूं भयनाशा सख्यराजी ॥
गेले स्नाना विप्र तया अन्न न भाजी ॥
आतां देती शाप सहासी यति कृष्णा[2] ॥
हाका मारी मत्तमयूरी परि कृष्णा ॥

### ३९ विभावरी. पा०

वदति ते कवि तयास विभावरी ॥
न भ ज जा ग गण ज्या चरणावरी ॥
त्रिदश जाण चरणांतिल अक्षरें ॥
गुरु वधे करितें जा अंतिं आदरें ॥

चरणांत अक्षरें १३ गण. न. भ. ज. ज. ग.

उदाहरण. वा० अनंतक०

रुदन ते करितसे जनकात्मजा[3] ॥
कुमति हे उपजली कशि आत्मजा ॥
तुरग बांधुनि शिखावरि ऊठला ॥
पडतसे धरणि होउनि आकुला ॥

---

१ मत्तमयूर म्हणजे मोर आहे.
२ द्रौपदी. ही दुर्वास ऋषि धर्मराजास आला तेव्हां कृष्णाला हाक मारते.
३ जानकी रामाचा अश्व लवानें धरला तेव्हां शोक करिते.

### ४० वसंततिलका[1] पा०

ह्मणा वसंततिलका ह्मय तेंच वृत्त ॥
येती जियें त भ ज जा ग ग हे सुवृत्त ॥
संख्या चतुर्दश पदांतिल अक्षरांची ॥
होतें जनांतें अपकीर्ति निरक्षरांची ॥

चरणांत अक्षरें १४ गण. त. भ. ज. ज. ग. ग.

#### उदाहरण. दु० शाकुंतल ना०

घोडे कधीं न खळती रविच्या रथाचे ॥
उलंघितो पवन भाग सदा नभाचे ॥
भूभार शेष धरि संतत मस्तकांहीं ॥
राजास विश्रम तसा क्षण मात्र नाहीं ॥

### ४१ प्रहरणकलिता. ७, ७.

प्रहरणकलिता कवि ह्मणति तिला ॥
न न भ न ल ग हे गण असति जिला ॥
अवयव[2] चवदा प्रतिपदिं भरले ॥
गुरु पद धरितां जन बहु तरले ॥

चरणांत अक्षरें १४ गण. न. न. भ. न. ल. ग.

#### उदाहरण. वा० राम० आो०

निशि दिनिं रिपुचें भय जरि तुजला ॥
अठिव सतत तूं विषधरसतिला[3] ॥
अवन करिल ती जननि तशि सदा ॥
त्यजिल न महिषासुरमथनि कदा ॥

---

१ या वृत्ताला सिंहोन्नता, उद्धर्षिणी, मधुमाधवी, अशींही नांवें आहेत.
२ अक्षरें. ३ दुर्गेला.

४२ असंबाधा. य० ५, ९

त्या वृत्ताला बोलति सुकवि असंबाधा ॥
ज्याच्या पादीं ये म त न स ग ग निर्बाधा ॥
एके पादीं अक्षर भरतिल तीं चौदा ॥
पुण्याचा तूं लौकर करिं मनुजा सौदा ॥
•चरणांत अक्षरें १४. गण. म. त. न. स. ग. ग.

उदाहरण. वा० राम० सो०

मोठे दाते ते तनुधन सह गेले कीं ॥
स्वर्गा त्यांचे भूवरि गुन उरले लोकीं ॥
गौळी यांतें तो यदुपति दिसतो साधा ॥
भक्तांची जो दूर सहज करितो बाधा ॥

४३ मध्यक्षामा. य० ४, १०,

मध्यक्षामा सुकवि म्हणति त्या वृत्ताला ॥
पादीं पादीं म भ न य ग ग येती ज्याला ॥
एके पादीं अवयव चवदा वा येती ॥
दाते ते जे तनुधन गरिबाला देती ॥
चरणांत अक्षरें १४ गण. म. भ. न. य. ग. ग.

उदाहरण. दु० स्वकृत.

नंदाजीनें कटिवरि हरि घेई गाथा ॥
गेहा जातां मनसिज बहु देई बाधा ॥
कुंजारण्या प्रति हरि सह राधा गेली ॥
तेथें ज्यांनीं बहुविध चिर केली [1] केली ॥

---

१ क्रीडा

### ४४ मालिनी. व० ८, ७.

म्हणति कवि तयाला मालिनी वृत्त तेव्हां ॥
न न म य य असे हे संघ[1] येतात जेव्हां ॥
प्रतिचरणिं हि पंधा अक्षरें ही तयाचीं ॥
हरिहर चरणाला आपुलें हीत याचीं ॥
चरणांत अक्षरें १५ गण. न. न. म. य. य.

#### उदाहरण. दु० शाकुं० ना०

तरुवर सुफलांच्या आगमीं नम्र होती ॥
जलदहि जलभारें खालती फार येती ॥
सुपुरुष विनयातें भाग्य काळीं धरीती ॥
उपकृति करित्यांची आणिजे हीच रीती॥

### ४५ चामर. पा०

चामराख्य वृत्त तेंच बोलती कवी सदा ॥
जेथ रा ज रा ज रा असेच लागती पदा ॥
योजितां पदांत होति अक्षरें हि पंधरा ॥
पाहतांचि सज्जनासें वाकेवाचि कंधरा ॥
चरणांत अक्षरें १५ गण र. ज. र. ज. र.

#### उदाहरण. वा० राम० सो०

राधिका पहावयास आतसे रमापती ॥
प्राकृता समान त्यास वृद्ध गोप कोपती ॥
त्यां कळे न हा हरीच गोकुळांत पामरा ॥
नीच मार्जनी समान मानितात चामरा ॥

---

१. गण.

### ४६ पंचचामर. वा०

तयास पंचचामराख्य वृत्त बोलती सदा ॥
ज रा ज रा ज गा असेच संघ ज्याचिया पदा ॥
दश सहा पहा गणून अक्षरें पदांत या ॥
जयाचिया मनासि शांति सौख्य सर्वदा तया ॥

चरणांत अक्षरें १६ गण. ज. र. ज. र. ज. ग.

### उदाहरण. वा० वेणीसं० वा०

अजून [1] केश तूमचे विमुक्त नाहिं जाहले ॥
कशी करील बद्ध ही अधींच बाइ आपले ॥
अशा मदीय उत्तरें मनांत फार ज्योचली ॥
जणू गमे शिला उरीं सुरीच काय बोचली ॥

### ४७ शिखरिणी. य० ६,११.

तया वृत्ता देती विबुध जन संज्ञा शिखरिणी ॥
जयामध्यें येती य म न स भ ला गा गण गणीं ॥
दश आणी सात प्रतिचरणिं ही अक्षरमिती ॥
विसावातो ज्यांचा गुरुचरणिं सांगू तुज किती ॥

चरणांत अक्षरें १७ गण. य. म. न. स. भ. ल. ग.

### उदाहरण. वा० रघुनाथ० पं०

कदा [2] नेणों ओढी शरधिंतुनि काढी शर कदा ॥
कदा धन्वीं जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा ॥
विपक्षाच्या पक्षा वरि विचर लक्षास्तव रणीं ॥
कळे रामेंद्राची त्वरित शरसंधान करणी ॥

---

१ द्रौपदीच्या वाक्यांनीं दुर्योधनाची कशी मानुषनी शिला उत्तर केलें आहे.
२ मल्लराजाचें वर्णन आहे.

### ४८ पृथ्वी. य० ८,९.

सुवृत्त बहु चांगलें ह्मणति सुज्ञ पृथ्वी तया ॥
अधीं ज स ज त्यापुढें स य ल गा हि येती जया ॥
पदांत सतरा पहा असति अक्षरें मोजुनी ॥
पदा शरण येति ते तरति कीर्ति ऐशी जुनी ॥
चरणांत अक्षरें १७ गण. ज. स. ज. स. य. ल. ग.

#### उदाहरण. बा० मोरोपं०

प्रसाद तुमचा कळानिधिहुनी गुणें आगळा ॥
हरी नतमनोमळा निजसुरद्रुमाचा मळा ॥
करी रत सदा बळानुजपदीं[1] मना चंचळा ॥
सुखेंचि पुरवी लळा सुचिर कीर्ति दे उज्वळा ॥

### ४९ हरिणी. य० ६,४,७.

ह्मणति हरिणी त्या वृत्ताला पशूंत जसी रुरू[2] ॥
न स म र स हे आधीं येती पुढेंच लघू गुरू ॥
प्रतिचरणिंही येती सत्रा समानचि[3] अक्षरें ॥
शरण गुरूच्या पाया जावें करीलचि तो बरें ॥
चरणांत अक्षरें १७ गण. न. स. म. र. स. ल. ग.

#### उदाहरण. बा० मोरोपं०

अभय दिधलें आहे बाहे शुचि प्रतिभाखरा[4] ॥
विधुमणिचिया सारा तारा[5] कारण पाखरा ॥
जडहि कविता जोडी गोडी गुणीं हरिच्या धरी ॥
सहज तुमचा हीना दीना प्रसाद समुद्धरी ॥

### ५० मंदाक्रांता. य० ४,६,७.

मंदाक्रांता ह्मणति तिजला वृत्त तें मंद चाले ॥

---

१ कृष्णपदीं. २ मृगविशेष. ३ चारी चरणांत सारखीं. ४ स्फूर्तिरूप ज्ञा
५ चंद्र.

ज्याच्या पादीं म भ न त त हे आणि गा दोन आले ॥
एक्या पादीं गणति सतरा अक्षरांचीच होते ॥
काठी रामा भैरवनंदितुंनी सोंतसें फार गोते ॥
चरणांत अक्षरें १७ गण. म. भ.*न. त. त. ग. ग.

उदाहरण. बा० अमररामचं० ना०

हाहा[१] देवी हृदय फुटलें देह माझा गळाला ॥
वाटे शून्य त्रिभुवन मला अंतरात्मा जळाला ॥
या आत्म्यानें किति तरि सदा दुःखभारा धरावें ॥
मोह व्यापी फिरफिरुनि म्या काय आतां करावें ॥

५१ विबुधप्रिया. ३,५,५५.

होतसे विबुधप्रियाभिध वृत्त तें बरवें तिये ॥
रा स जा ज भ रा असे गण येति सा सरसे त्रिये ॥
अक्षरें अठराच येतिल पादिं मोजुनियां पहा ॥
दीनतारक दुःखहारक शंभुमारक राम हा ॥
चरणांत अक्षरें १८ गण. र. स. ज. ज. भ. र.

उदाहरण. बा० रामचंद्र सो०

राधिका सखि आज ती भज आणि भेटिस रामसे ॥
देतसें धन फारसें तव मानसा अवडे तसें ॥
चित्त हें तिज पाहुनी भमलें दुजी न सुचे क्रिया ॥
प्राण आइल वाटतो अरि येइना विबुधप्रिया ॥

५२ शार्दूल विक्रीडित. प० १२, ७.

आहे वृत्त विशाल आस म्हणती शार्दूल विक्रीडित ॥
मा सा जा स त ता ग येति गण हे पादास कीं ओढित ॥

---

१ लीलामिरतामुळें रामचंद्र शोक करतो.

एकोणीस पहा गणूनि चरणीं येतात हीं अक्षरें ॥
तेजः पुंज नभों अंगणीं पसरलीं रत्नें पहा नक्षरें[1] ॥
चरणांत अक्षरें १९ गण. म. स. ज. स. त. त. ग.

उदाहरण. बा० मोरोपं०

जो लोकत्रितयीं फिरे स्थिर नसे ताटीं जसा पारद ॥
स्वांतध्येयपदींच निश्चल भवांभोधींत जो पारद ॥
जो वर्णे गगनोदरीं क्षण दिसे पूर्णेंदु कीं शारद ॥
श्रीशांतःपुरचत्वरींच उतरे तो सन्मुनी नारद ॥

५३ स्रग्धरा. य० ७,७,७.

कंठीं माळा धरी जी सुरुचिर तिजला स्रग्धरा नाम देती ॥
त्या वृत्तीं एकपादीं म र भ न य य या हे गण स्पष्ट येती ॥
ज्याच्या प्रत्येक पादीं भरतिल गणितां अक्षरें एकवीस ॥
श्रीरामाचें स्वभद्र स्मरणं मग कसें होइंना तें कवीस ॥
चरणांत अक्षरें २१ गण. म. र. भ. न. य. य. य.

उदाहरण. बा० मोरोपं०

माझा[2] प्रेमा सुदामा हरिसख दुबळा शब्द संदोह जो हे ॥
साधूंपासीं श्रुतीनें पदर पसरुनी जोडिले स्वल्प पोहे ॥
या दीनोपायनातें बुधजन भगवान् प्रीतिनें फार गोडी ॥
आणोनी श्रोतृवक्त्रीं भरिल बहुदया मानुनी तेहि थोडी ॥

५४ अमृतध्वनि. ४,७,७,४.

साराऽमृतध्वनि उदारा नरा सुखवि दारा तिलाच म्हणती ॥
ता भा य जा स र न गा हेच जय गण एकेक पादिं गणती ॥
बेवीस येति चरणीं अक्षरें गणुनि पाहींच संशय जरीं ॥
रक्षावया परमभक्तासें संकटिचें देत्या वधी नरहरी ॥
चरणांत अक्षरें २२ गण. त. भ. य. ज. स. र. न. ग.

---

१ नक्षत्रें. २ मोरोपंत कवीनें आपला प्रेमा आणि सुदामा यांचें रूपक केलें आहे.

### उदाहरण. वा० आनंदतनय.

माला[1] करीं हृदय मालासि तें भसित ज्याला मृगाजिन कटी ॥
लोला जटा रुळति दोलापरी परम कोलाहलध्वनि उठी ।
हा लाभ मानुनिच नीलालका सुकृतशीला तयास नमिती ॥
आला मुनी निज घराला म्हणूनि मग झाला पुढें नरपती ॥

### ५५ मंदारमाला. य० ४,६,६,६.

मंदारमाला कवी बोलती हीस कोणी हिला अश्वधाटी असें ॥
सातातकारीं[2] जियें हा घडे पाद तेथें गुरू एक अंतीं वसे ॥
या मोजितां एकपादांत निभ्रांत येतील बावीस कीं अक्षरें ॥
वागर्वेया तापें तारावेया यासें नारायणा तूंचि ये सत्वरें ॥
चरणांत अक्षरें १२ गण. त त. त. त. त. त. त. ग.

### उदाहरण. वा० मोरोपंत

वाचाळ मी नीट पाचारितों धीट याचा नयो वीट माचा हरी ॥
खोटा जरी मी चखोटा मधें तूंचि मोठा कृपेच्या न तोटा घरीं ॥
दाता सुखाच्या सदा तारिता आपदा ताप हे एकदा तापटीं[3] ॥
या संतसेवाळल्या संपदा दे भया संग नाशील या संकटीं ॥

### ५६ उमा. य० ६,६,६,४.

तीस उमा कवि बोलति जी बहु आवडती गिरिशास सती ॥
तत्पदिं सात भ नामक हे गण शेवटिं एक गुरू असती ॥
बाविस अक्षर दावि सदा पद लागुनि राहिल नेमचिया ॥
मीनें जळाविणें दीनें तसा हरि हीनें कृपेविणें मी तुझिया ॥
चरणांत अक्षरें २२ गण. भ. भ. भ. भ. भ. भ. भ. ग.

---

१. जनकाच्या घरीं विश्वामित्र गेला त्याचें वर्णन आहे.
२ सात तगणांनीं.    ३ दूर घालीव.

### उदाहरण. वा० आनंदतनय.

यापरिचे भवताप विमोचन चापशरांकित भव्यमती ॥
पाहुनि सर्व नृपांहुनि उत्तम लाहुनि तोष पुसे नृपती ॥
कोण असे महिपाळकबाळक हे जगचाळकसे सुचले ॥
सांग भला सहसा गमनाशय चांग मनांत मला रुचले ॥

### ५७ मदिरा. ६,६,६,५.

ती मदिरा कवि बोलति जी मन मोहुनियां जन लाविल नादीं ॥
ज्या गण सात भनामक आधिंच दोन गुरू मग येतिल पादीं ॥
अक्षर संमिति पाहसि तूं जरि तेविस होतिल नेमचि याचा ॥
साधुंनि सर्वैरँ घ्यां स्वँहितां तुंम्हि कांहिंचँ नेंमँ नंसें स्वँवँयांचां ॥
चरणांत अक्षरें २३ गण. भ. भ. भ. भ. भ. भ. भ. ग. ग.

### उदाहरण. दु० स्वकृत.

पाहुनि दीनजनांस जळाविण मीन तसा अति दुःखित होतो ॥
कष्टवुनी निजदेह जना बहु तुष्टवि नित्यचि साधु अहो तो ॥
जो उपकार करी सुजनावरि अंतरिं निर्मळ भाव धरीतो ॥
साधितसे परकीयहिता परि साधन आत्महितींच करीतो ॥

### ५८ मदिरा किंवा सवाई. ६,६,६,५.

ठेविति नाम तया मदिरेसचि थोरथोर कविराज सवाई ॥
चार भकार पुढें र न भा ग ग जेथ जेथ गण येतिल पाई ॥
यांतहि तेविस अक्षरसंमिति पादिं पादिं सम मोजुनि घेई ॥
सज्जँनँ संगँ निरंतँरँ जोडुँनि दुष्टँ संगँतिसँ सोडुँनि देई ॥
चरणांत अक्षरें २३ गण. भ. भ. भ. भ. र. न. भ. ग. ग.

### उदाहरण. वा० मोरोपंत.

राम रघूत्तम कामरिपुप्रिय लोक शोक हरं यापरि भावें ॥
दाशरथे सुज होउनियां पदिं लीन दीन जनबंधुसि गावें ॥

आमरणस्मृति हेच असो वय याच साच सुपथांत सरावें ॥
दे वरदा वर या शरणाप्रति पाप ताप जलधीस तरावें ॥

### ५९ दुसरी सवाई. ७,६,६,४.

कविजन त्या मदिरेसचि लक्षुनि ठेविति नाम सवाइ तिला ॥
प्रथम नकार जकार सहा मग शेवटिं ते ल ग येति जिला ॥
भरतिल तेविस अक्षर एकपदीं जरिं मोजुनि पाहसि तीं ॥
प्रतिदिनं वाढतसे हि उगावतसे विधु पक्षि सिती असितीं ॥

चरणांत अक्षरें २३ गण. न. ज. ज. ज. ज. ज. ज. ल. ग.

### उदाहरण वा० मोरोपंत.

शिव हृदयालय कीं सुखदायक निर्जरनायक सेव्य पदा ॥
अभय मला जरि देसि अपाय निवारुनि पाय नमीन सदा ॥
तुज भुजगाभभुजासि असे वर मागतसें वरदान करा ॥
रघुकुलवंशवतंस दशाननसंततिकाननदाहकरा ॥

## अर्धसमवृत्तें.

### ६० हरिणीप्लुता.

विषमीं त्रिसकार ल गा असे ॥ न भ भ र क्रम हाच समीं वसे ॥
विषमीं अकरा चरणीं युता ॥ द्विदश अक्षरें ती हरिणी प्लुता ॥

चरण १,३ अक्षरें ११ गण. स. स. स. ल. ग. चरण २,४ अक्षरें
१२ गण. न. भ. भ. र.

### उदाहरण वा० नवनीत.

मजला गिरिराज कळीव या ॥ वनलतांत नकीं लपली प्रिया ॥
कृश अंग तिचें अति निर्मळ ॥ प्रिय निरंतर भाषण कोमळ ॥

### ६१ माल्यभारा.

विषमींच पदीं स सा ज गा गा ॥ समपादीं स भ रा य येति भागा ॥
विषमीं अकरा समींच बारा ॥ तरि संज्ञा तिस होय माल्यभारा ॥

चरण १, ३ अक्षरें ११ गण. स. स. ज. ग. ग. चरण २,४ अक्षरें १२
गण. स. भ. र. य.

उदाहरण. वा० प्रसन्नराघव.

निजकाव्यरसेंच तृप्त होती ॥ पण काव्यें परकीय साधु गाती ॥
निजपुष्परसें अळे बुडालें ॥ पण तो कुंभजळेंच आम्र डोले ॥

पुष्पिताग्रा.

विषमिं चरणीं ननारया हा ॥ नजजरगा क्रम हा समांत पाहा ॥
द्विदश विषमिं अक्षरें समग्रा ॥ त्रिदश समीं पदिं तीच पुष्पिताग्रा ॥
च० १,३ अ० १२ गण. न. न. र. य. च० २, ४ अ० १३ ग० न. ज. ज. र. ग.

उदाहरण. वा० रामचंद्र जो०

नृपजन नगरींत सोय पाहा ॥ नृपभजना त्यजुनी घरीं न राहा ॥
नगरिहि भरली दिसे समग्रा ॥ ध्वजशिखरीं लतिकाच पुष्पिताग्रा ॥

---

मात्रागणवृत्त.

आर्यावृत्तें.

आर्येच्या प्रत्येक अर्धांत साडेसात मात्रागण असावे. त्यांत विषमस्थानीं ज गण नसावा आणि षष्ठस्थानीं ज गण किंवा न गण यावा हा सामान्य नियम आहे.

आर्यांचे भेद.

गीति.

आर्यागीत्युपगीत्युद्गीत्यार्यागीति हे असे पांच ॥
आर्यांचे भेद पहा छंदःशास्त्रांत वर्णिले साच ॥
आर्या, गीति, उपगीति उद्गीति, आर्यागीति, असे पांच भेद आहेत.

१ आर्यालक्षण.

आर्येच्या प्रथमपदीं, द्वादश मात्रा तशाच तिसऱ्याही ॥
अष्टादश दुसऱ्याला, आणिक चवथ्यास पंचदश ॥

उदाहरण बाहेरचें.

नूतन पल्लव फुटला, असला तरु आणिला प्रियेनें तो ॥
लवकर चालायाला, तोंडाशीं गज पहा नेतो ॥

२ गीतिलक्षण.

गीतीच्या प्रथमपदीं, द्वादश मात्रा तशाच तिसऱ्याला ॥
दुसऱ्या पादीं अठरा, मात्रा असती तशाच चवथ्याला ॥

उदाहरण. श्रा० मोरोपंत.

तरला ययाति राजा, दर्शन होतांच संतरायाचें ॥
सद्दर्शनचि सुदर्शन, करि गट चट कटक अंतरायाचें ॥

उपगीतिलक्षण.

उपगीतीच्या पहिल्या, तिसऱ्याही द्वादशचि मात्रा ॥
दुसऱ्या आणिक चवथ्या, मात्रा पादांत पंध्राची ॥

उदाहरण बाहेरचें.

यत्नें श्रेय कळाया, शास्त्रानुभवहि तसा तसा भावें ॥
सद्गुरुला शरण कपट, दंभहि टाकूनियां जावें ॥

उद्गीति लक्षण.

उद्गीतीच्या पहिल्या तिसऱ्याही द्वादशचि मात्रा ॥
दुसऱ्या पादीं पंध्रा, चवथ्या पादांत येति अष्टदश ॥

उदाहरण. स्वकृत.

देवा मी शरण तुला, आलों मज तूंचि सांभाळीं ॥
तूंचि समर्थ पुसाया, दुर्लिपि माझ्या असेल जी भाळीं ॥

१ आर्यागीतिलक्षण.

पहिल्या चरणीं बारा ॥ मात्रा दुसऱ्यांत सात आणी तेरा ॥
उभयदळीं हे रीती ॥ जीस तिला म्हणति सुज्ञ आर्यागीती ॥

### उदाहरण. आ० मोरो०

मी प्रिय करिन सकळवा ॥ आहे कीं, व्रज अहो असाध्वस कळवा ॥
निवसा घरिं घोरांनीं ॥ रात्रिं फिरावें शिवेच्छु न रिघो रानीं ॥

आर्येचे पथ्या, चपला, विपुला इत्यादि अवांतर भेद पुष्कळ आहेत ते येथें लिहिले नाहींत.

## परिशेष.

केवळ प्राकृत कवितेंत मात्र येणारीं अशीं कांहीं छंदें आहेत त्यांतून प्रसिद्ध तीं प्रसंगवशात् येथें सांगतों, तीं हीं.—अभंग, दिंडी, साकी, ओंवी, आणि घनाक्षरी.

### १ अभंग छंद.

अभंग मुख्यत्वें दोन प्रकारचे आहेत. एक मोठा अभंग आणि एक लहान अभंग. त्यांत मोठ्या अभंगाचे दोन प्रकार आणि लहान अभंगाचे तीन प्रकार असे सर्व मिळून पांच प्रकार आहेत. ते क्रमानें सांगतों.

### मोठा अभंग.

मोठ्या अभंगास चार चरण असतात, त्यांत पहिल्या तीन चरणांस प्रत्येकीं सहा सहा अक्षरें आणि चवथ्या चरणास चार अक्षरें असतात.

#### पहिला प्रकार.

दुसऱ्या आणि तिसऱ्या चरणाच्या शेवटीं यमक असतें.

#### उदाहरण. अभंग तुकारामाचे.

काय वाणू आतां ॥ नपुरे ही वाणी ॥ मस्तक चरणीं ॥ ठेवीयला ॥ १ ॥
थोरींव सांडिली ॥ आपुली परिसें ॥ धन्य केलें कैसें ॥ लोखंडासी ॥ २ ॥
जगाच्या कल्याणा ॥ संतांच्या विभूती ॥ देह कष्टविती ॥ उपकारें ॥ ३ ॥
भूतांची दया हें ॥ भांडवल संतां ॥ आपुल्या ममता ॥ देहीं नाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे सुख ॥ पराचिया दुःखें ॥ अमृत हें मुखें ॥ स्रवतसे ॥ ५ ॥

### दुसरा प्रकार.

पहिल्या, दुसऱ्या, आणि तिसऱ्या चरणास यमक असतें.

### उदाहरण. अभंग तुकारा०

पंढरीस जावें ॥ जीवन्मुक्त व्हावें ॥ केशवा भेटावें ॥ जीवलगा ॥ १ ॥
जन हे सुखाचे । दिल्या घेतल्याचे । या अंतकाळींचे । नाहीं कोणी ॥ २ ॥

### लहान अभंग.

लहान अभंगास दोन चरण असतात. प्रत्येक चरणास आठ आठ अक्षरें असतात. क्वचित् पहिल्या चरणास सहा अक्षरें असतात. दोन्ही चरणांस यमक असतें.

### उदाहरण. अभंग तुकारा०

जरी व्हावा तुज देव ॥ तरी सुलभ उपाव ॥ १ ॥
करीं मस्तक ठेंगणा ॥ लागें संताच्या चरणा ॥ २ ॥
भावें गावें गीत ॥ शुद्ध करोनीयां चित्त ॥ ३ ॥
तुका म्हणे फार ॥ थोडा करीं उपकार ॥ ४ ॥

### याचा दुसरा प्रकार.

दुसऱ्या चरणाचीं सात अक्षरें असून चवथें यमकाक्षर असतें.

### उदाहरण. अभंग तुकारा०

पुढें आतां कैचा जन्म ॥ ऐसा श्रम वारसा ॥ १ ॥
पांडुरंगा ऐसी नांव ॥ तारी भाव असतां ॥ २ ॥

### याचा तिसरा प्रकार.

याला आठ आठ अक्षरांचे चार चरण असतात, आणि पहिल्या तीन, रणांच्या शेवटीं यमक असतें.

### उदाहरण. अभंग. तुका०

देवा पायीं नाहीं भाव ॥ भक्ति वरी वरी वाव ॥
समर्पिला नाहीं जीव ॥ जाणावा हा व्यभिचार ॥ १ ॥

### दिंडी छंद.

दिंडीला चार चरण असतात, आणि चरणाच्या शेवटीं यमक असतें. त्यांत कोठें दोनदोन चरणांचीं सारखीं, कोठें चारी चरणांचीं सारखीं यमकें असतात. ह्या छंदास अक्षरांचा नियम नाहीं, पण मात्रांचा नियम आहे. प्रत्येक चरणास १९ एकोणीस मात्रा असतात, आणि नवव्या मात्रेवर अवसान असतें. ह्मणून ९ मात्रांचा एक व १० मात्रांचा एक असे दोन भाग होतात. त्यांच्या मात्रांची रचना अशी असावी कीं, पहिल्या भागांत प्रथम तीन मात्रांचा एकगण, ह्मणजे एक गुरु, एक लघु, किंवा एक लघु, एक गुरु, किंवा तिन्ही लघु असा असावा. त्यापुढें तीन गुरु, किंवा सहा लघु, किंवा लघु गुरु मिळून सहा मात्रांचा गण असावा. दुसऱ्या भागांत पहिल्याप्रमाणें प्रथम तीन मात्रांचा गण, मग पुन्हा तसाच आणखी तीन मात्रांचा गण, त्याच्यापुढें ह्मणजे शेवटीं दोन गुरु असावे.

### १ उदाहरण. दिंडी. रघुनाथ पंडित.

कथा बोलूं हे, मधुर सुधाधारा ॥ होय शृंगारा, करुणरसा थारा ॥ १ ॥
निषधराजा नळ, नामधेय होता ॥ वीरसेनाचा, तनय महा होता ॥ २ ॥

### २ उदाहरण. दिंडी. रघु० पं०

सौगुणीनें जरि पूर्णशीत भानु ॥ नळा ऐसा तरि कळानिधी मानूं ॥
प्रतापाचा जो न मावळे भानू ॥ तयासारीखा कोण दुजा वानूं ॥ १ ॥

## ३ साकी छंद.

प्रत्येक साकीला दोन चरण किंवा दोन अर्धे असतात. आणि दोहोंच्या शेवटीं यमक असतें. प्रत्येक अर्धांत चार मात्रांचा एक गण असे सात गण ह्मणजे २८ अठ्ठावीस मात्रा असतात. चवथ्या गणाच्या अंतीं ह्मणजे सोळाव्या मात्रेवर अवसान असतें. पूर्वीं मात्रावृत्तांत मात्रागण पांच प्रकारचे सांगितले आहेत. त्यांतून कोण-तेही गण असले तरी चिंता नाहीं, पण गण निरनिराळे मोजतां येतील असे असावे आणि शेवटीं गुरु अक्षर यावें.

### उदाहरण. साक्या मोरोपंत.

श्रीरघुवंशीं ब्रह्मप्रार्थित, लक्ष्मीपति अवतरला ॥
विश्वसहित ज्याच्या जनकत्वें, कौसल्याधव तरला ॥ १ ॥
रावत्रि सिद्धिसि आश्रमिं जो तो, गाधिज मागुनि ने त्या ॥
शिकवि बलातिबला विद्या शत, अस्त्रें विधिच्या नेत्या ॥ २ ॥
जनकमखातें मुनिसह जातां, प्रभुनें गौतमभार्या ॥
उद्धरिली ती पतिसह पूजी, स्तवुनि अहल्या आर्या ॥ ३ ॥
यशकरिभारी भवधनु भंगुनि, हर्षे सीता बाळा ॥
माळा घालुनि वरिती झाली, रामा त्रिजगत्पाळा ॥ ४ ॥

## ४ ओंवी छंद.

ओंवीला चार चरण असतात. तीन चरणांच्या शेवटीं यमक असतें, चवथ्याला नसतें. पहिल्या तीन चरणांस आठ आठ अक्षरें आणि शेवटच्या चरणास सात अक्षरें असावीं. हा मुख्य नियम. परंतु शब्द, अर्थ ह्यांच्या अनुरोधानें कवि उणीं अधिक अक्षरें घालतात.

उदाहरण. ओंवी ज्ञानदेव.

जो सर्वां भुतांचे ठायीं ॥ द्वेषातें नेणेचि कांहीं ॥
आप पर जया नाहीं ॥ चैतन्य पैं जैसें ॥

उदाहरण. ओं० मुक्तेश्वर.

पौरववंशीं प्रख्यात कीर्ती ॥ दुष्यंत नामा गुणैक मूर्ती ॥
श्रेष्ठ भूपालचक्रवर्ती ॥ वीर्ये शौर्ये आगळा ॥ १ ॥

उदाहरण. ओं० एकनाथ.

मस्तकींचे नीळ कुंतळ ॥ जेंवि नभ अति सुनीळ ॥
तळीं मुखचंद्र निर्मळ ॥ भीमकीचा उगवला ॥

उदाहरण. ओं० श्रीधर.

यशोदा म्हणे हे जगजेठी ॥ आतां कैंची तुझी भेटी ॥
स्नेहें उमाळे उठती पोटीं ॥ स्तनीं पान्हा फुटलासे ॥ १ ॥

उदाहरण. ओं० रामदास.

आतां वंदूं कवीश्वर ॥ जे शब्दसृष्टीचे ईश्वर ॥
नाहीं तरी हे परमेश्वर ॥ वंदावे ते ॥ १ ॥

५ घनाक्षरी छंद.

घनाक्षरी छंद ओंव्यांप्रमाणें आहे; पण तशा चार मिळून एक घनाक्षरी होते. घनाक्षरीला सोळा चरण येतात; चार चरण मिळून तिचा पाद होतो; प्रत्येक पादाच्या पोटचे चार चरण. त्यांत पहिल्या तीन चरणांस प्रत्येकीं आठ अक्षरें असून १२ मात्रा असाव्या.

आणि चवथ्या चरणास सात अक्षरें असून .११ मात्रा असाव्या, असा प्रायः नियम असतो. प्रत्येक पादांत तीन तीन चरणांचीं यमकें आणि प्रत्येक पादाच्या चवथ्या चवथ्या चरणांचीं यमकें असावीं. ह्यास उदाहरणें.

### उ० घनाक्षरी वामनाची.

अहो कैकेयी हें काय ॥ केलें तुवां हाय हाय ॥
न म्हणवे तुज माय ॥ जन्मोजन्मीं वैरिणी ॥ १ ॥
सर्व जगदभिराम ॥ वना धाडिला तो राम ॥
केलें विख्यात कुनाम ॥ कीं हे पतिमारिणी ॥ २ ।
तुझ्या वधें न अधर्म ॥ तुज मारावें हा धर्म ॥
परि निंदील हें कर्म ॥ राम पापकारिणी ॥ ३ ॥
नाहीं तरीं प्राण आज्य ॥ तुझे घालोनियां प्राज्य ॥
जाळोनियां सामराज्य ॥ दाखवितों करणी ॥ ४ ॥

### उदाहरण दु० घनाक्षरी वामनाची.

म्हणे भरत हा राम ॥ आहे आहे मेघश्याम ॥
वसिष्ठ हा गुरु नाम ॥ तोही मज कोपला ॥ १ ॥
अंतरले तुझे पाय ॥ तया राज्याचे उपाय ॥
सांगे मज हाय हाय ॥ नव्हे गुरु आपला ॥ २ ॥
अग्नितुल्य वाटे राज्य ॥ मज जाळील साम्राज्य ॥
वरी ऋषी घाली आज्य ॥ त्यानें जीव तापला ॥ ३ ॥
दावीं सत्वर चरण ॥ किंवा स्वामी दे मरण ॥
तुझ्या नामाचें स्मरण ॥ त्याचा भव संपला ॥ ४ ॥

उदाहरण. घना० मोरोपंत.

विश्वामित्र तपोधन । त्याचें तोषवाया मन ॥
तृषितें तृषिता वन ॥ पीतां द्यावें ज्या परी ॥ १ ॥
गुरूकें दशस्यंदन ॥ रामलक्ष्मणनंदन ॥
अर्पी करूनि नंदन ॥ चित्तीं ह्मणे हापरी ॥ २ ॥
बळानिबळाख्या दोन ॥ विद्या दे गुण वदोन ॥
प्रवास राज्यपदोन ॥ न वाटे त्याउपरी ॥ ३ ॥
प्रेमें अस्त्रशतदान ॥ दे रामास बहुमान ॥
गाधिज सत्कथापान ॥ करवी परोपरी ॥ ४ ॥

उदाहरण. घना० मोरोपंत.

मुनि गुरु ह्मणे हाण ॥ तोंचि सोडोनि सुबाण ॥
ताटकेचे हरी प्राण ॥ राम लावी न क्षण ॥ १ ॥
सिद्धाश्रमीं निशाचर ॥ सुबाहु प्रमुख खर ॥
संहारी हणोनी शर ॥ करी यज्ञ रक्षण ॥ २ ॥
पुंखवातें महाशूर ॥ मारीच्या उडवी दूर ॥
दैवें नाहीं झाला चूर ॥ तोकीं तें विलक्षण ॥ ३ ॥
विश्वामित्र सभाजन ॥ करी स्तुतीस भाजन ॥
सर्व ऋषी सभाजन ॥ झाले तेव्हां सक्षण ॥ ४ ॥

याशिवाय प्राकृत कवितेंत अनेक प्रकारच्या चालींचीं पदें, कटिबंध, चूर्णिका, इत्यादि प्रकार आहेत ते सांगण्याची येथें आवश्यकता नाहीं ह्मणून सांगितले नाहींत. सवाई ह्मणून जो प्रकार आहे तो वृत्तांत धरण्यासारखा आहे ह्मणून तो वर सांगितला आहे.

## उपसंहार.

### श्लोक.

हें वृत्तदर्पण अतज्ज्ञजनार्थ केलें ॥ सुज्ञांसमोर जरि धैर्य धरोनि नेलें ॥
ऐकोन हांसतिल रीति नवीच कानें ॥ हातीं तथापि धरितीलचि कौतुकानें ॥१॥

येथें जें पडलें उणें अधिक तें विद्वज्जनीं साहिजे ॥
प्रेमें पूर्ण कृपा करोनि बरवें केलें तिहीं पाहिजे ॥
जे जे थोर परोपकाररत त्यां हें योग्य आहे सदा ॥
त्यांचा तो उपकार फारच आम्ही मानूं सदा सर्वदा ॥ २ ॥

धुंडोनियां वृत्तसुधाकरातें ॥ जे लागले वृत्तमणी करातें ॥
करोनि त्यांचीच सुवृत्तमाला ॥ समर्पिली म्यां विबुधोत्तमाला ॥ ३ ॥

हा ग्रंथ गोडबोले उपनामक परशुराम तात्यानें ॥
केला वाचायाला याच्या हृदयांत रसिकता यानें ॥ ४ ॥

सत्राशें व्यायशींच्या हा संपला रौद्रवत्सरीं ॥
श्रावणाच्या कृष्णपक्षीं दशमी भानुवासरीं ॥ ५ ॥

समाप्त.

BOMBAY: PRINTED AT THE EDUCATION SOCIETY'S PRESS, BYCULLA.